कुरळप ता.वाळवा, जिल्हा सांगली येथील तलाव संवर्धनाच्या कामासाठी निधी वितरित करण्याबाबत ..

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०१२/प्र.क्र.७४/तां.क.३**
नवीन प्रशासन भवन, १५ वा मजला, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २६ जून, २०१८

**वाचा -**

१) पर्यावरण विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दिनांक: १३ मार्च,२०१३, २८ मार्च २०१३ व दिनांक २८.११.२०१४

२) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सांगली यांचे पत्र क्र नियोजन/का-१४-१(४ )/पर्यटन/५६०/२०१८, दिनांक २६.२.२०१८ रोजीचे पत्र

**प्रस्तावना -**

राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सांगली यांचेमार्फत कुरळप, ता. वाळवा येथील तलावाच्या पर्यावरणीय संवर्धन प्रस्तावास संदर्भाधीन दिनांक १३ मार्च, २०१३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. उपरोक्त तलाव संवर्धनाच्या अनुषंगाने मंजूर करण्यात आलेली कामे राबविण्यासाठी संदर्भाधीन दिनांक २८ मार्च,२०१३ व दिनांक २८ नोव्हेंबर, २०१४ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे अनुक्रमे एकूण रुपये ५०.०० लक्ष व रुपये ५०.०० लक्ष मिळून एकूण रुपये १००.०० लक्ष (रुपये शंभर लक्ष फक्त) एवढी रक्कम मुक्त करण्यात आली होती. सदर रक्कमेचा पूर्णपणे विनियोग केल्याबाबत उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हानियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, सांगली यांनी सादर केले आहे. उपरोक्त कागदपत्राच्या आधारे तसेच एकूण खर्चाच्या अनुषंगाने कुरळप ता, वाळवा, जिल्हा सांगली येथील तलावाच्या पर्यावरण संवर्धनासाठी झालेल्या खर्चास उर्वरित निधी मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. राज्य योजनेखाली राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सांगली यांचेमार्फत कुरळप, ता. वाळवा येथील तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक १३ मार्च, २०१३ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे रुपये २०२.६५ लक्ष इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येऊन राज्य हिश्श्यापोटी देय असलेल्या रक्कम एकूण रुपये १८२.३९/- (रुपये एक कोटी ब्याऐंशी लक्ष एकोणचाळीस हजार फक्त) इतक्या रक्कमेपैकी आतापर्यन्त रुपये १००.०० लक्ष (रुपये शंभर लक्ष फक्त) इतका निधी वितरित करण्यात आला असून या शासन निर्णयान्वये कुरळप, ता. वाळवा येथील तलावाच्या संवर्धनासाठी उर्वरित कामे राबविण्यासाठी पुढील हप्ता रुपये ५०,००,०००/- लक्ष ( अक्षरी रुपये पन्नास लक्ष फक्त ) इतक्या रक्कमेस मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत कुरळप, ता. वाळवा, जिल्हा सांगली येथील तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी राज्य हिश्श्यापोटी देय एकूण रुपये १८२.३९ लक्ष (रुपये एक कोटी कोटी ब्याऐंशी लक्ष एकोणचाळीस हजार फक्त) एवढया रक्कमेपैकी या शासन निर्णयाव्दारे उर्वरित कामे राबविण्यासाठी पुढील हप्ता

रुपये ५०,००,०००/-लक्ष ( रुपये पन्नास लक्ष फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास जिल्हाधिकारी, सांगली यांना या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी जिल्हाधिकारी, सांगली ( Collector, Sangli ) यांचे नांवे रुपये ५०,००,०००/-लक्ष ( रुपये पन्नास लक्ष फक्त ) एवढया रकमेचा धनादेश काढण्यात यावा.

४. जिल्हाधिकारी, सांगली यांना अदा करावयाची रक्कम रुपये ५०,००,०००/- लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून जिल्हाधिकारी, सांगली यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्रीम. शिल्पा चं. शिर्के, कक्ष अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. म.बा. हजारी, सह सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांनी जिल्हाधिकारी, सांगली यांना रुपये ५०,००,०००/-लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त ) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाव्दारे वितरित करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२),पर्यावरण प्रतिबंध (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२) ३१,सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य- लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ वर्षात अर्थसंकल्पित रु.२५००.०० लक्षच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा

६. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३०४७/१४६१, दिनांक १३.३.२०१३ अन्वये तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्रक्र. ८९/अर्थ-३, दिनांक २७ एप्रिल, २०१६ मधील परि. क्र.७(क) अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. प्रमाणित करण्यात येते की, दिनांक २०.४.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.७ ते १८ मधील प्रत्येक अटीची तसेच परिशिष्टातील अनु.क्र.३ व ९ मधील सर्व अटींची पूर्तता होत आहे. तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ रोजीच्या अटी व शर्तीनुसार वितरित करण्यात येत आहे.

८. याशिवाय, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र..क्र.९४/अर्थ-.३, दिनांक ३० जून, २०१७ अन्वये परिच्छेद क्र.४ मधील खालील बाबींची पूर्तता होत आहे. .

१. जिल्हाधिकारी, सांगली यांनी वितरित करण्यात आलेल्या अनुदानाचा १००% विनियोग पूर्ण केला असल्याबाबत उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे.
२. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र .यू४-, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण,१०३ , वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२),पर्यावरण प्रतिबंध ) (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५०१८२), ३१,सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही
३. जिल्हाधिकारी सांगली यांनी लगतच्या मागील महिन्याची बँक अकाउंट स्टेटमेंट (Bank Account Statement ) शासनास सादर केली आहे.तसेच विभागामार्फत आतापर्यन्त करण्यात आलेला खर्च ७० % च्या मर्यादेत आहे.
४. परिच्छेद क्र.४ मधील ४ ते १५ या बाबी लागू नाहीत.

९ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०७१०१३४५४६२००४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

१०. महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Shilpa Chandrashekhar Shirke

Digitally signed by Shilpa Chandrashekhar Shirke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Environment Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=21b5a39b05a9599cbf12d283890a954dbc03dacea20beb3547439b161f0d9ca7, serialNumber=dc3e6352f8ddff6ee7cba172c1b7355f054ad9cebf92cfb082b587d829c70d70, cn=Shilpa Chandrashekhar Shirke
Date: 2018.07.10 13:47:41 +05'30'

**( शिल्पा चं. शिर्के )**
**कक्ष अधिकारी, पर्यावरण विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
४. जिल्हाधिकारी, जिल्हा कार्यालय, सांगली
५. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
८. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१०. प्रधानसचिव, ग्राम विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
११. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१२. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१३. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती.